**शासकीय अधिका-यांना वैयक्तिक संगणक खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : अग्रिम-१०९९/प्र.क्र. ५७ /९९/विनियम**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २५ जानेवारी , २०००**

वाचा : १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अग्रिम-१०९६/प्र.क्र.४१/९६/विनियम, दि. ३०.१०.९६
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अग्रिम-१०९८/प्र.क्र.१६/९८/विनियम, दि. १७.६.९८.

## शासन निर्णय

राज्य शासकीय अधिका-यांना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींच्या अधिन राहून वैयक्तिक संगणक खरेदी करण्यासाठी संगणक अग्रिम अनुज्ञेय आहे. शासनाने संदर्भाधिन शासन निर्णयामधील काही प्रचलित अटींमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा व काही अटी रद्द करण्याचा निर्णय घेतला आहे. :-

| प्रचलित अट<br>आदेश क्रमांक, अटीचा अनुक्रमांक व प्रचलित अटीचे वर्णन | सुधारीत अट<br>अट क्रमांक व सुधारील अटीचे वर्णन |
|---|---|
| संदर्भ .(२) येथील दि.१७.६.१९९८ चे पूरक पत्रातील अनुक्रमांक (१) प्रमाणे प्रचलितअट :-<br>ज्या राजपत्रित अधिका-यांचे मूळ वेतन रु.२०००/- किंवा त्यापेक्षा जास्त आहे (राजपत्रित कक्ष अधिकारी व इतर वरीष्ठ राजपत्रित अधिकारी) त्यांना वैयक्तिक संगणक अग्रिम अनुज्ञेय राहील. | अट क्र.(१)<br>सुधारीत अट :-<br>ज्या राजपत्रित अधिका-यांचे मूळ वेतन रु.६५००/- किंवा त्यापेक्षा जास्त आहे त्यांना वैयक्तिक संगणकअग्रिम अनुज्ञेय राहील. |
| संदर्भ क्र.(१) येथील दि.३०.१०.१९९६ च्या शासन निर्णयातील अनुक्रमांक (८) प्रमाणे प्रचलित अट<br>अग्रिम अदा केल्यानंतर १ महिन्याच्या आत संबंधित अधिका-याने संगणक खरेदी केला नाही तर त्याच्याकडून संपूर्ण रक्कम दंडनीय व्याजासह वसूल करण्यात यावी. | अट क्र.(८)<br>सुधारीत अट<br>वैयक्तिक संगणक खरेदीसाठी व्याजरहित अग्रिम अदा केल्यानंतर एक महिन्याच्या आत संबंधित अधिका-याने वैयक्तिक संगणक खरेदी केला नाही तर किंवा अग्रिमाचा गैरवापर केल्यास त्याच्याकडून संपूर्ण अग्रिम १७.७५ टक्के व्याज दराने एक रकमी वसूल करण्यात यावे. |

९५-1052(12,500+15-2-००)

( कृ.मा.प.

| ---------- | नवीन अट क्र.(१५)<br>वैयक्तिक संगणक खरेदी करण्यासाठी अग्रिमाधी सविस्तर नोंद सेवा पुस्तकात घ्यावी. |
|---|---|

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

बा.व. सावंत
शासनाचे उप सचिव,
वित्त विभाग.

प्रति,

1. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई-400 032.
2. महालेखापाल (लेखा परीक्षा) -1, महाराष्ट्र, मुंबई-400 020,
3. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -2, महाराष्ट्र, नागपूर,
4. महालेखापाल (लेखा परीक्षा) -2, महाराष्ट्र, नागपूर,
5. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-400 051,
6. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
7. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
8. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
9. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई,
10. राज्यपालांचे सचिव,
11. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
12. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
13. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
14. * प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई,
15. * प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,
16. * प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.3 व 4, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई,
17. * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
18. * प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
19. * प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई-400 051,
20. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
21. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
22. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
23. सर्व उप कोषागार अधिकारी,
24. मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
25. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
26. सर्व विभागीय आयुक्त,
27. सर्व जिल्हा अधिकारी,
28. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
29. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
30. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-110 001,
31. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-8, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली-110 001,
32. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---

* पत्राने.

एच-1052(12,500+15-2-00)अ.